महाराष्ट्र महसूल न्यायाधिकरणाकरिता
विभाग प्रमुख घोषित करण्याबाबत..

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्र. एमआरटी-२०१८/प्र.क्र.१८७/ज-१अ**

हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ०९ ऑक्टोबर, २०१८.

**संदर्भ** :- १. शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्रमांक एमआरटी-१००७/प्र क्र ८३/टी-१, दिनांक १२/१२/२००७

२. शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्रमांक :एमआरटी-१००७/प्र क्र १८०/टी-१, दिनांक १४/२/२००८

३. शासन परिपत्रक, महसूल व वन विभाग क्रमांक ओएफएम-२०१८/प्र.क्र.२७४/ई, दिनांक १८/६/२०१८

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र जमीन महसूल संहिता १९६६ (दुसरी सुधारणा) अधिनियम २००७ दिनांक १३/१२/२००७ रोजी अंमलात आला आहे. त्या अधिनियमातील कलम ३१३ आणि ३१४ अनुसार उपरिनिर्दिष्ट दिनांक १२/१२/२००७ च्या शासन निर्णयान्वये महाराष्ट्र महसूल न्यायाधिकरणाचे मुंबई येथे मुख्यपीठ व औरंगाबाद आणि नागपूर येथे खंडपीठाची स्थापना करण्यात आली आहे. वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग पहिला, उप विभाग एक मधील अनुक्रमांक १ नियम २ अनुसार मुंबई वित्तीय नियम १९५९ अंतर्गत नियमाखाली प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारानुसार संदर्भ क्र.२ वरील दिनांक १४/२/२००८ च्या शासन निर्णयाद्वारे उप सचिव, महसूल व वन विभाग (टी-१ कार्यासन) यांना महाराष्ट्र महसूल न्यायाधिकरणाचे विभाग प्रमुख म्हणून घोषित करण्यात आले होते.

०२. तथापि, “महाराष्ट्र महसूल न्यायाधिकरणाच्या प्रशासनिक व अर्थसंकल्पविषयक बाबी” हा विषय टी-१ या कार्यासनाकडून यापूर्वी हाताळण्यात येत होता व या विभागाच्या दिनांक १८/६/२०१८ च्या आदेशान्वये, सदर विषय ज-१ अ या कार्यासनाकडे हस्तांतरीत करण्यात आला आहे.

०३. यानुषंगाने, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग पहिला, उप विभाग एक मधील अनुक्रमांक १ नियम २ अनुसार मुंबई वित्तीय नियम १९५९ अंतर्गत नियमाखाली प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारानुसार या शासन निर्णयाद्वारे उप सचिव / सह सचिव (ज-१अ), महसूल व वन विभाग यांना महाराष्ट्र महसूल न्यायाधिकरणाचे “विभाग प्रमुख” म्हणून घोषित करण्यात येत आहे.

०४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०१८१००९१५३९०७४११९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sunil Shridhar Kothekar

Digitally signed by Sunil Shridhar Kothekar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a4e83b3f4c3a086b626255c2b2cb37acdeb67b59b5e9ecbb4d25b60ccef2c660, cn=Sunil Shridhar Kothekar
Date: 2018.10.09 15:41:22 +05'30'

**( सुनिल कोठेकर )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) - I, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
२) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-II, महाराष्ट्र राज्य, नागपूर,
३) महालेखापाल (लेखा परीक्षा)- I, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
४) महालेखापाल (लेखा परीक्षा)- II, महाराष्ट्र राज्य, नागपूर,
५) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
६) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई,
७) वित्त विभाग / विनियम,मंत्रालय,मुंबई,
८) प्रबंधक, महाराष्ट्र महसूल न्यायाधिकरण, मुंबई,
९) उप प्रबंधक, महाराष्ट्र महसूल न्यायाधिकरण, औरंगाबाद व नागपूर खंडपीठ,
१०) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
११) का.अ.,ब-१, महसूल व वन विभाग,मंत्रालय,मुंबई-४०० ०३२.
१२) निवड नस्ती (ज-१ अ).